


सी.बी.टी. प्रकाशन

# लाली आणि बबलूचे आंब्याचे झाड

रुपा गुप्ता






"लाली आणि बबलूचं आंब्याचं झाड" ही चित्रकथा मूळ इंग्लिश चित्रकथा "लाली अॅण्ड बबलुज मँगो ट्री" चे मराठी रुप आहे. १९८५ मध्ये सी.बी.टी. व युनिसेफनी "नॅशनल कॉम्पिटिशन फॉर रायटर्स ऑफ चिल्ड्रन्स बुक्स" नांवाची स्पर्धा आयोजित केली होती. मुलांना गोष्टीरुपातून हे समजाविण्यासाठी की मुलगा व मुलगी हयात काही फरक नाहीं दोघेही समान आहेत. त्यातून निवडलेल्या कथां पैकी एक आहे "लाली आणि बबलूचे आंब्याचे झाड."

"बौना कालू" आणि "हा नवा खेळाडू कोण" ही लेखिकेची पुस्तक पण सी.बी.टी. तर्फे प्रकाशित झाली आहेत.

प्रथम आवृत्ति 1988
पुनर्मुद्रित 1989

**LALI ANI BABLUCHE AMBYACHE JHAD**

चित्रकार — सॅम्युअल
अनुवाद — सुनीता गाडगीळ


ISBN 81-7011-366-0

चिल्ड्रन्स बुक ट्रस्ट, नेहरु हाउस, 4 बहादुरशाह ज़फर मार्ग, नवी दिल्ली द्वारा प्रकाशित व ट्रस्ट च्या इंद्रप्रस्थ प्रेस नवी दिल्ली मध्ये मुद्रित.

# लाली आणि बबलूचे आंब्याचे झाड



"खट खट खट," लालीनं शेवटचा खिळा लाकडावर ठोकला. नंतर तिनं हातोडी बाजूला ठेवली आणि वाळूचा कागद [हा कागद लाकडावर घासून लाकूड गुळगुळीत करतात] हातात घेतला आणि स्टूलाचा वरचा पृष्ठ भाग कागदाने घासून गुळगुळीत केला.

"बघा,आजोबा बघा," हातातील स्टूल उंच धरत आजोबांना दाखवत मोठया उत्साहाने ती म्हणाली. "आता फक्त याला रंगाचा हात मारला की माझं काम झालं".

"वा, फारच छान," तिच्या आजोबांनी कौतुक केले. आजोबा आंब्याच्या झाडाखाली हुक्का ओढत बसले होते. "कोणाचा विश्वास बसेल का की दहा वर्षाच्या मुलीनं हे बनवले आहे म्हणून! माझी खात्री आहे की तू मोठी झालीस की माझ्यापेक्षा चांगली निष्णात सुतार होशील."

"आणि मी आजोबा?" लालीचा भाऊ बबलूनी रांगोळी काढता काढता विचारले.

''तू आपल्या गांवातला सगळयांत चांगला कलावंत होशील''. त्याच्या आजीनं घरातून बाहेर येत त्याला उत्तर दिलं. ''बघा तर खरं, त्यानी आंब्याचं काय हुबेहुब चित्र काढलं आहे,'' ती आपल्या यजमानांना उद्देशून म्हणाली. ''माझ्यापेक्षा सुध्दा चांगलं काढलं आहे.''





"अरे हो!बरी आठवण झाली, भोलू मिस्त्री उद्या पुन्हा येणार आहे."
''कशा करता?'' आजोबांनी विचारले.
''ते आंब्याचं झाड कापायला,'' आजी म्हणाली.
मुलांनी जेंव्हा हे ऐकल तेंव्हा त्यांना धक्काच बसला. काम थांबवून ती म्हणाली, "तुम्ही आमचं झाड तोडू नका''.
''भोला आपल्याला लाकडाचे खूप पैसे देणार आहे आणि आपल्याला पैशाची फार गरज आहे,'' आजी म्हणाली.

रडू आवरत बबलूने विचारले, "आजी तुम्ही इतके दुष्ट कसे झालात?" लाली सुध्दा रडकुंडीला आली होती. "अरे झाडाला फळे आली असती तर आम्ही विकायचा विचारसुध्दा केला नसता," आजोबा म्हणाले. "पण काय करणार तुमच्या झाडावर अजून एक सुध्दा आंबा लागला नाही. असलं वांझोटं [फळ न देणारं] झाड ठेवून काय उपयोग? आता सुध्दा बघा, केवढा मोहर आला आहे पण सगळा झडून जाणार, नाही तर सुकून जाणार".

"फळं नाही लागली तर काय झालं? झाड किती सुंदर आहे आणि आम्हांला तर ते खूपच आवडतं," लाली म्हणाली.



आजोबा आणि आजीला मुलांकरता फार वाईट वाटलं. आजोबा हळुच आजीच्या कानांत काही तरी पुटपुटले. आणि मग मुलांकडे वळून आजी म्हणाली, "ठीक आहे आम्ही उधा काही झाड कापणार नाही, एक महीना भर थांबू. पण एक महिन्यानेसुध्दा जर आंबे लागले नाहीत तर मात्र झाड कापावं लागेल." मुलांनी सुटकेचा निश्वास टाकला. निदान झाडाचं आजचं मरण उद्यावर ढकललं म्हणून त्यांना बरं वाटलं.



रात्री आजोबांनी मुलांना पुस्तकं घेऊन अभ्यास करायला सांगितला. लालीचं काही अभ्यासाकडे लक्ष लागेना. कसंही करुन आपलं झाड वाचवलं पाहीजे हाच विचार तिच्या डोक्यांत घोळू लागला. ती मार्ग शोधू लागली आणि तिला एक कल्पना सुचली. "बबलू मला झाड वाचवायची एक युक्ति सुचली आहे." ती हळुच बबलूच्या कानांत पुटपुटली.

"कोणती?" बबलून विचारले.

"ऐक आपण जर थोडे आंबे विकत आणून झाडाखाली पसरले तर आजोबा, आजीला वाटेल झाडाला फळं लागताहेत लाली म्हणाली मग."त्यांना वाटेल की झाड कापू नये." "छानच कल्पना आहे. पण बाईसाहेब,आंबे आणायला पैसे कुठून आणणार?" बबलूने विचारले. तेवढयांत आजोबा आत आले आणि दोघं एकदम गप्प झाली.

दुसऱ्या दिवशी सकाळी आजोबांनी मुलांना लाकडी बाक शेजारच्या मास्तरांच्या घरी पोचवायला सांगितले. मास्तर तिथल्याच शाळेत शिकवायचे आणि त्यांच्या शेजारीच रहायचे. मुलं मास्तरांच्या घरी पोचली, त्यांना तिथं काहीतरी कार्यक्रमाची गडबड दिसली. ''लग्नाची तयारी दिसते आहे,'' हळूच लाली म्हणाली. तेवढयांत मास्तरांची पत्नी ज्यांना ''ताई'' म्हणत असत त्या बाहेर आल्या.



मुलांना पहाताच त्या म्हणाल्या, "अगदी वेळेवर आणलंत रे बाक मुलांनो! मला एका नवऱ्या मुलीला बसवायला चौरंगाची पण जरूरी आहे. कुठं मिळेल? तुम्हांला माहित आहे?"

"ताई, तुम्हांला चौरंग पाहिजे ना? मी स्वतः एक चौरंग तयार केला आहे. तुम्हांला हवा तर तो घ्या," लाली म्हणाली.





"तुम्ही किती चांगली आहात बाळांनो, पण लग्नाकरता साधा चौरंग कसा चालेल? नवऱ्या मुलीकरता छान रंगवलेला नक्षीदार चौरंग पाहिजे. तुम्हा कोणाला अशी नक्षी काढणारा माहित आहे का?"

"ताई, हा बबलू आहे ना, तुम्हांला हवी तशी छान नक्षी काढून देईल," लाली म्हणाली. ताईंना खूप आनंद झाला. त्यांनी मुलांना पटकन घरी जाऊन चौरंग रंगवून आणायला सांगितले. रंग, ब्रश नक्षीचा कागद वगैरे आणण्यासाठी पैसे पण दिले.

मुलांनी दुपारभर बसून चौरंग रंगवला, नक्षी काढली. बबलूने लाल आणि पिवळया रंगाने सुंदर कमळ काढलं. तो नक्षीदार रंगवलेला चौरंग पाहताच मास्तरांची पत्नी एकदम खुश झाली. ''इतका सुंदर चौरंग मी कधीच पाहिला नव्हता,'' म्हणत त्यांनी मुलांना पंचवीस रुपये काढून दिले.



लालीने पैसे मुठीत घटट् पकडले आणि भावाबरोबर ती बाजारांत जाण्यासाठी धावत सुटली. तेवढया थोडया पैश्यात येतील तेवढे कच्चे आंबे त्यांनी आणले आणि घरात लपवून ठेवले.



त्या रात्री आजी आजोबांना झोप लागेपर्यंत बबलू व लाली जागत बसली नंतर दोघं हळूच उठले, बागेत जाऊन कच्चे आंबे झाडाखाली पसरवून आले. दुसऱ्या दिवशी सकाळी आजीच्या ओरडण्याने ती दोघे जागी झाली. तिनं कच्चे आंबे पाहिले आणि आनंदाने म्हणाली, "बघा झाडाला आंबे यायला लागले, मला ही नव्हतं वाटलं हो, की झाडाला आंबे लागतील म्हणून". कच्चे आंबे पाहिल्यावर आजोबा म्हणाले, "अरे काल वारा वगैरे काही नव्हता आणि हे कच्चे आंबे पडले कसे?"



“काही तरीच तुमचं. आपण झोपलो असताना रात्री वादळ झाल असणार,” आजी म्हणाली. बबलूने हसू बाहेर फुटू न देता आजीला विचारले, “आजी आता तर तू झाड कापणार नाहीस ना?” “नाही रे बाळा, फळं देणारं झाड तोडण्याचा आता प्रश्नच येत नाही”. आजीनं आश्वासन दिलं.

आणखी कांही दिवसांनी मुलांनी शिल्कीच्या पैशातून आणखी थोडे कच्चे आंबे आणले आणि झाडाखाली पसरले. यावेळी आजोबांनी ते आंत आणून ठेवले. “इथे काही तरी मजेशीर घडतं आहे,” मुलांकडे एकटक पाहत आजोबा म्हणाले. पण आजोबांनी पुढे काही बोलायच्या आत दोन्ही मुले बाहेर खेळायला पळून गेली.

त्या दिवशी संध्याकाळी भयंकर जोराचं वादळ झालं. आजीनं भराभरा कंदिल लावला. मुले आजीला अगदी बिलगून बसली. आजोबांनी पाहीलं मुलं खूपच घाबरली आहेत. तेव्हा त्यांनी रामायणातल्या गोष्टी वाचून दाखवायला सुरुवात केली. दिव्याच्या उबेत बसून गोष्टी ऐकता ऐकता मुले बाकी सर्व काही विसरली. रात्रभर वादळ चालू होते. सकाळी जेव्हा मुलं जागी झाली तेव्हा नुकतंच कुठं वादळ थांबलं होतं. आजी अंथरुणावर नव्हती.

त्यांनी आजोबांना विचारले. आजोबा म्हणाले, "अरे ती सकाळीच आंब्याच्या झाडाखालचे आंबे गोळा करायला गेली आहे".

"कुठले आंबे?" मुलांनी एकदम घाबरत विचारले.

"का? अरे काल रात्री एवढं जोराचं वादळ झालं तेंव्हा झाडाखाली खूपच आंबे पडले असणार," आजोबा म्हणाले.

''पण-पण आजीला आज तिथं काही आंबे सापडणार नाहीत,'' लाली चाचरत म्हणाली . ''हो! कारण काल रात्री आम्ही आंबे झाडाखाली पसरलेले नाहीत,'' बबलू बोलून गेला.

आजोबा जरा कडक आवाजांत म्हणाले, "पोरांनो काय ते खरं सांगा पाहू''. मुलांनी सांगितलं त्यांच्या आवडत्या झाडाला वाचविण्यासाठी त्यांनी कशी कच्चे आंबे पसरण्याची युक्ति केली ते.

''तरीच! पहिल्यांदा जेव्हा आम्ही कच्चे आंबे गोळा केले ते लंगडा जातीचे होते, पण दुसऱ्यावेळी दशहरी होते." ते सगळे मिळून आजीला सांगायला बाहेर पडले.

झाडापाशी पोहोचताच त्यांना आश्चर्याचा धक्काच बसला. कारण झाडाखाली खूप म्हणजे खूपच आंबे पडलेले होते.

"अय्या, हे कसं झालं?" लाली आश्चर्याने उदगारली. मुलांनी खात्री पटण्यासाठी डोळे चोळून चोळून बघितलं की हे स्वप्न तर नाही ना?

"झाडाला आंबे लागणार नाहीत हयाची आम्हाला एवढी खात्री होती कीआम्ही कधी झाडाकडे वर मान करुन पाहिलंच नाही," बबलू म्हणाला.

आजोबा हे ऐकताच हसून म्हणाले, "तुम्हाला धन्यवाद देण्यासाठीच जणू झाडानी हे आंबे दिले आहेत." अन् ते तिघेही आंबे वेचू लागले.

